कृषि विभागातील कृषि आयुक्तालय व अधिनस्त कार्यालयाकरिता गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GEM) प्रणालीव्दारे खरेदीसाठी व सदर प्रणालीच्या वापरासाठी अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबत..

**महाराष्ट्रशासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृषिआ-१५१७/प्र.क्र.२४२/१६-अे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-** ४०० ०३२
तारीख: १८ डिसेंबर, २०१८

<u>वाचा</u>- १) शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७
२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/वाहन/जेम नोंद./अधि.नियु./मृद-७/१६६६/२०१७, दि.०४.०८.२०१७
३) शासन निर्णय क्रमांक : कृषिआ-१५१७/प्र.क्र.२४२/१६-अे,दि. १३ ऑक्टोंबर,२०१७.
४) शासन निर्णय क्रमांक: किप्रशा-१५१८/प्र.क्र ४१/१७ अे, दि.८ मार्च,२०१८.
५) आयुक्तालयाचे पत्र क्रमांक कृआ/लेखा-१/गव्हर्नमेंट ई-प्रणाली/४७६३/२०१८, दि.२७.११.२०१८

**<u>प्रस्तावना</u> -**

केंद्र शासनाने राष्ट्रीय खरेदी धोरणाअंतर्गत केलेल्या बदलांनुसार शासकीय विभाग/संस्थाकडून केल्या जाणाऱ्या वस्तुंच्या खरेदीसाठी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GEM) पोर्टल विकासित केले आहे. गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GEM) पोर्टलच्या कार्यपध्दतीस राज्य शासनास वस्तू व सेवा खरेदी करण्यासाठी उद्योग, उर्जा व कामगार विभागाने दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयानुसार मान्यता दिलेली आहे. त्यानुसार वेळोवेळी आयुक्तालयाने केलेल्या विनंतीनुसार उपरोक्त संदर्भ क्र.३ व ४ चे शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहेत. संदर्भ क्र.५ नुसार आयुक्तालयाने केलेल्या विनंतीनुसार संदर्भ क्र.३ व ४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून, खालीलप्रमाणे एकत्रित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

कृषि आयुक्तालय व अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांसाठी पडताळणी अधिकारी (Verifying Authority) यांना वाहन विषयक कामकाजाबरोबर इतर सर्व प्रकारच्या वस्तु/सेवा यांचे आयुक्तालय व विभागीय स्तरावरील खरेदीसाठी प्राथमिक वापरकर्त्याच्या पोर्टलवरील नोंदणीस मान्यता देण्यासाठी आणि प्राथमिक वापरकर्ता (Primary User) यांना पडताळणी अधिकऱ्यांची मान्यता प्राप्त झाल्यानंतर पोर्टलवर दुय्यम वापरकर्त्याचे खाते उघडून देणे आणि शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (Gem) पोर्टलवर दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार खरेदी प्रक्रिया पार पाडतांना नियंत्रक म्हणून काम पाहण्याकरिता खालील नमूद अधिकाऱ्यांना जबाबदार प्राधिकारी घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्तव्य/जबाबदारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | पडताळणी अधिकारी (Verifying Authority) आयुक्तालय व विभागीय स्तर | संचालक (मृद संधारण ) कृषि आयुक्तालय, पुणे |
| २ | प्राथमिक वापरकर्ता (Primary User) कृषि आयुक्तालय स्तर | सह संचालक (मृद संधारण), कृषि आयुक्तालय, पुणे |
| | प्राथमिक वापरकर्ता (Primary User) विभागीय स्तर | संबंधीत विभागीय कृषि सहसंचालक |

१. सदरची खरेदी करतांना उद्योग, उर्जा व कामगावर विभागाच्या दि.०१.१२.२०१६, दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२. Gem पोर्टलव्दारे वस्तू/सेवांची खरेदी करण्यासाठी प्रत्येक खरेदी कार्यालयाने Gem पोर्टलवर User तयार करतांना संबंधित कार्यालयात खरेदी करणारा व वस्तु /सेवा प्राप्त करुन घेणारा एकच असू शकतो, परंतू खरेदी करणारा आणि वस्तू व सेवा प्राप्त करुन घेणारा, हा देयक अदा करणारा असणार नाही, अशा पध्दतीने User तयार करावयाचे आहेत.

३. Gem पोर्टलव्दारे वस्तू/सेवांची खरेदी प्रक्रिया राबविण्याच्या अनुषंगाने प्रशिक्षण साहित्य (डेमो) gem.gov.in/training या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. तरी सदर प्रणाली च्या वापरकत्यांनी (Users) प्रशिक्षण साहित्याच्या आधारे, शासनाने विहित केलेल्या खरेदीबाबतच्या अटी व शर्तीनुसार व Gem पोर्टलवरील अटी व शर्तीनुसार वस्तु/सेवांची खरेदी प्रक्रियेची कार्यपध्दती अवलंबवावी.

४. सदर कार्यपध्दती अवलंबताना तांत्रीक/अन्य अडचणी उद्भवल्यास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या खालील समन्वय कक्षामध्ये संपर्क साधण्यात यावा.

ई मेल -ak.rai@gem.gov.in, dicspo@maharashtra.gov.in

संपर्क क्रमांक ०२२२२०२३५०५

वरील सर्व सूचनांचे पालन काटेकोरपणे करुन कार्यालयातील वस्तू व सेवांविषयक सर्व खरेदी Gem पोर्टलव्दारे करण्यात यावी.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१८१७३०५३८८०१असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2018.12.18 17:34:51 +05'30'

( सु.सं. धपाटे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव

२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा.विधानमंडळ सदस्य
६. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.संचालक (सर्व), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.विभागीय कृषी सहसंचालक (सर्व)
१२.जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१३.सहसंचालक (आस्थापना), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१५.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६.निवडनस्ती (कार्यासन-१६ ए), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.